**माहुल, चेंबुर, येथील नवीन पोलीस वसाहतीच्या दुरूस्तीच्या कामांसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचे फेरवितरण करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक दुरूस्ती-१०१८/प्र.क्र.३६५/दोन/पोल-७**

२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक ०६ ऑक्टोबर २०१८.

**वाचा :-**

१) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्रमांक पोप्रमा-०३१७/प्र.क्र.२३१/एक/पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.

२) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्रमांक पोप्रमा-०३१७/प्र.क्र.२३१/दोन/पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.

३) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्रमांक पोप्रमा-०३१७/प्र.क्र.२३१/तीन/पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.

४) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्रमांक पोप्रमा-०३१७/प्र.क्र.२३१/चार/पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.

५) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्रमांक पोप्रमा-०३१७/प्र.क्र.२३१/पाच/पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.

६) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक पोप्रमा-०११७/प्र.क्र.८०/पोल-७, दिनांक ३१.०३.२०१७.

७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्रमांक पोआ/कक्ष-८(१३)/शा.३११/२०१७, दिनांक १०.१०.२०१७.

८) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्रमांक पोआ/कक्ष-८(१३)/शा.२०६/२०१८, दिनांक १०.०८.२०१८.

९) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्रमांक संकीर्ण-०११८/प्र.क्र.१२/पोल-७, दिनांक १५.०९.२०१८.

१०) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्रमांक पोआ/कक्ष-१४/अर्थसं-१/न.क्र.९२/१७५/१८, दिनांक ०४.१०.२०१८.

११) शासन पत्र, गृह विभाग, क्रमांक संकीर्ण-०११८/प्र.क्र.१२/पोल-७, दिनांक ०४.१०.२०१८.

**प्रस्तावना.-**

शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/प्र.क्र.२३१/एक-ते-पाच/पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७, यांद्वारे, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील माहुल, चेंबुर, येथील नवीन पोलीस वसाहतीतील इमारत क्र.२१ ते २८ आणि ६७ ते ६९ अंतर्गत रस्ते तयार करणे व बाह्य भागाची दुरूस्ती करणे या कामांसाठी, एकूण ₹१६,१९,७५,१३९/-

(रुपये सोळा कोटी एकोणीस लक्ष पंचाहत्तर हजार एकशे एकोणचाळीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

२. शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक पोप्रमा-०११७/प्र.क्र.८०/पोल-७, दिनांक ३१.०३.२०१७, द्वारे उक्त कामांसाठी एकूण ₹ १२,८३,५०,०००/- (रुपये बारा कोटी त्र्याऐंशी लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. तथापि, माहुल, चेंबुर, येथील सदनिकांमध्ये पोलीस कर्मचारी राहण्यास इच्छुक नसल्यामुळे उक्त इमारतींचा वापर अन्य प्रयोजनासाठी करता येईल आणि उक्त निधी हा पोलीस विभागाच्या इतर इमारतींच्या दुरूस्तीच्या कामांसाठी वापरण्यात यावा, असा प्रस्ताव पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयाच्या दिनांक १०.१०.२०१७ रोजीच्या संदर्भाधीन पत्राद्वारे सादर केला आहे. त्या अनुसार उक्त निधी हा पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिपत्याखालील इतर निवासी/ प्रशासकीय इमारतींच्या दुरूस्तीच्या कामांसाठी फेरवितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय.-

शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक पोप्रमा-०११७/प्र.क्र.८०/पोल-७, दिनांक ३१.०३.२०१७, याच्या विवरणपत्र "अ" मधील तक्त्यातील अ.क्र. १९ ते २३ मध्ये नमूद दुरूस्तीच्या कामांसाठी उपलब्ध करुन दिलेल्या एकूण ₹ १२,८३,५०,०००/- (रुपये बारा कोटी त्र्याऐंशी लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या निधीतून ₹ १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) इतका निधी हा शासन ज्ञापन, गृह विभाग, क्रमांक संकीर्ण-०११८/प्र.क्र.१२/पोल-७, दिनांक १५.०९.२०१८, द्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या, *"मुंबई शहरातील राज्य शासकीय पुरातन वास्तुंचे (antique homesteads) सौंदर्य जतन करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या परिरक्षेखाली असलेल्या पुरातन वास्तुंना पूर्ववत करणेबाबतच्या कार्यक्रमाखाली, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाच्या पुरातन वास्तुची फेज-२ अंतर्गत कामे करणे"* या कामांसाठी फेरवितरीत करण्यास, याद्वारे, मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त खर्च हा "गृह विभाग-मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत) (अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे" याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१००८१५२८५८०९२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.10.08 15:34:27 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, मुंबई.
३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.

**प्रत:-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल (पोल-७).